वारेगांव-कामठी (प्रजिमा ३४) छावणी हद्दीतून जाणा-या लांबी साठी पर्यायी वळणमार्ग.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१५/प्र.क्र.३७/नियोजन-२**
**मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- ३१ ऑगस्ट, २०१५.**

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे पत्र क्र.का.प्रआ/२१८४, दिनांक ११ मे,२०१५.
२) मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे पत्र क्र.साबांप्रावि/तां/२५२१/२०१५, दिनांक २ जून,२०१५.

**प्रस्तावना** :-

राज्य मार्ग क्र.३४७ ते वारेगांव, बोरगांव, कामठी, घोरपड, कन्ढोली, सावली, पडसाड, केम, शिवनी, झरप, महालगांव मार्ग ते राज्य मार्ग क्र.३४८ ला जोडणारा हा प्र.जि.मा.३४ असून, ह्या रस्त्याची वारेगांव ते कामठी दरम्यानची ३.२० कि.मी. लांबी छावणी भागातून (cantontment) जात असल्याने संरक्षण विभागामार्फत या रस्त्यावरील वाहतूक २०/०० कि.मी. प्रति तास पेक्षा कमी गतीने प्रतिबंधीत करण्यात आली आहे. त्यामुळे नियमित वाहतुकीची कोंडी होते व लोकांना फार त्रास सहन करावा लागतो. या रस्त्याऐवजी छावणी परिसरातील पश्चिम सीमेस लागून पर्यायी २.५२ कि.मी. चा रस्ता हा संरक्षण विभागाच्या मालकीचा असून, त्या पर्यायी रस्त्याची मागणी बरेच वर्षापासून लोक प्रतिनिधी व जनता सतत करत आहे. याबाबत मा.मंत्री, सा.बां., मा.मुख्य सचिव, मा.अ.मु.स.(सा.बां.), जिल्हाधिकारी, नागपूर व संरक्षण विभागाचे अधिकारी यांचे सोबत वेळोवेळी बैठकी घेण्यात आल्या आहेत. यास अनुसरुन छावणी हद्दीतील ३.२ कि.मी. लांबी रस्ते विकास योजनेतून वगळून (अवर्गीकृत) त्याऐवजी छावणी हद्दीतील परंतु सीमेलगत असलेली २.५२ कि.मी. इतकी लांबी प्र.जि.मा.३४ ची लांबी म्हणून मंजूर करण्याबाबत (वर्गीकृत) करण्याची मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.वि.,नागपूर यांची विनंती शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, नागपूर यांचा प्रस्ताव व त्याअनुषंगाने संदर्भाधीन क्र.२ येथील पत्रान्वये प्राप्त झालेला अहवाल, स्थानिक लोकप्रतिनिधीची विनंती विचारात घेऊन, नागपूर जिल्ह्यातील वारेगाव कामठी (प्र.जि.मा.३४) या रस्त्याच्या सा.क्र.४/५५० ते ७/७५० ही ३.२० कि.मी. इतकी लांबी अवर्गीकृत करण्यात येत आहे. त्याऐवजी सद्य:स्थितीत वारेगाव-कामठी छावणी परिसरातील पश्चिम सीमेलगत असलेली २.५२ कि.मी. इतकी लांबी रस्ते विकास योजना २००१-२०२१ मध्ये प्र.जि.मा.३४ ची लांबी म्हणून वर्गीकृत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८३११७०२१४०४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay Ganpat Amolkar

Digitally signed by Vijay Ganpat Amolkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijay Ganpat Amolkar
Date: 2015.08.31 17:05:41 +05'30'

**( विजय अमोलकर)**
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच प्रस्तावित रस्त्याच्या बांधकामाचा आवश्यक प्रस्ताव शासनास सादर करावा व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
२) मुख्य अभियंता, (मग्रारविसं), मंत्रालय, मुंबई.
३) विभागीय आयुक्त, नागपूर.
४) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, नागपूर (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच प्रस्तावित रस्त्याच्या बांधकामाचा आवश्यक प्रस्ताव शासनास सादर करावा व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
५) जिल्हाधिकारी, नागपूर.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.
७) कार्यकारी अभियंता, (सा.बां.) जिल्हा परिषद, नागपूर.
८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई

**प्रत, माहितीसाठी सादर.**

१) अ.मु.स.(सा.बां.) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई
२) सचिव (रस्ते) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.
३) उपसचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.
४) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
५) निवडनस्ती.